**सारंगखेडा बॅरेज मध्यम प्रकल्प ता.शहादा जि.नंदूरबार**
**तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव ..**

# महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. सुप्रमा-२००९/६५४/(२१३/०९)/मध्यम प्रकल्प
मंत्रालय, मुंबई
दिनांक :- २०/१०/२००९

संदर्भ : १) शासन पत्र क्र. १०९६/७५८/(२२९/९६) जसंअ/मंत्रालय, मुंबई दि.६.११.९६
२) महामंडळ निर्णय क्र. तापाविमं/कासं/प्रवि-४/सुप्रमा.१८/मप्र/१९९९ दि.६.४.१९९९
३) शासन निर्णय क्र. सारंगखेडा १०.०१/१०३०/(२५०/२००१)/मप्र/मंत्रालय, मुंबई दिनांक ७.२.२००२

## प्रस्तावना :-

नंदूरबार जिल्हयातील शहादा तालुक्यातील सारंगखेडा बॅरेज मध्यम प्रकल्पास शासन निर्णय क्र. १०९६/७५८/(२२९/९६)/जसंअ/मंत्रालय, मुंबई दि.६.११.९६ (दरसूची (९५-९६)) अन्वये रुपये ८९५३.७२ लक्ष (एकोणनव्वद कोटी त्रेपन्न लक्ष बहात्तर हजार लक्ष) एवढया अंदाजित खर्चास मूळ प्रशासकिय मान्यता देण्यात आली होती. तदनंतर महामंडळ निर्णय क्र. तापाविमं/कासं/प्रवि-४/सु.प्र.मा/१८/मप्र/१९९९ दिनांक ६.४.१९९९ (दरसूची ९७-९८) अन्वये प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता रुपये १५०१३.१५ लक्ष (एकशेपन्नास कोटी तेरा लक्ष व पंधरा हजार फक्त) एवढया अंदाजित खर्चास प्रदान करण्यात आली होती. त्यानंतर सर्वसाधारण भाववाढ व प्रकल्पाच्या संकल्पचित्र बदलांमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झाली. यासाठी शासन निर्णय क्रमांक : सारंगखेडा १०.०१/१०३०/(२५०/२००१)/मप्र, मंत्रालय, मुंबई दिनांक ७.२.२००२ (दरसूची १९९९-२०००) अन्वये द्वितीय सुधारित प्रशासकिय मान्यता रुपये २०२४७.५३ लक्ष (रुपये दोनशे दोन कोटी सत्तेचाळीस लक्ष व त्रेपन्न हजार फक्त) अंदाजित खर्चास प्रदान करण्यात आली होती.

आता दरसूचीतील भाववाढीमुळे, भुसपांदनातील वाढीमुळे तसेच संकल्पचित्रातील बदल आणि जास्त दराची निविदा स्विकृती इत्यादी कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झाली आहे. यासाठी महामंडळाने सादर केलेल्या तृतीय सुधारित प्रशासकिय अहवालास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

शासनाकडून आता या निर्णयाद्वारे नंदूरबार जिल्हयातील शहादा तालुक्यातील सारंगखेडा मध्यम प्रकल्पाच्या कामासाठी सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित रु. २७६४९.०५ लक्ष (रुपये दोनशे छयाहत्तर कोटी एकोणपन्नास लक्ष पाच हजार फक्त) एवढया रकमेस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये २२२३९.६० लक्ष (रुपये दोनशे बावीस कोटी एकोणचाळीस लक्ष साठ हजार फक्त) कामाप्रित्यर्थ व रुपये ५४०९.४५ लक्ष (रुपये चौपन्न कोटी नऊ लक्ष पंचेचाळीस हजार फक्त) अनुषंगिक खर्च आहे. सोबत सहपत्र-१ मध्ये सुधारित उपशीर्षवार तरतूद व सहपत्र-२ मध्ये सुधारित सर्वसाधारण गोषवारा दिला आहे.

१. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

२.	या योजनेस प्रदान केलेली तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अ.क्र. १६/२००९ वर नोंदविण्यात आली आहे.

३.	या प्रकल्पामुळे नंदूरबार जिल्हयातील ता.शहादा क्षेत्रातील ८७६८ हेक्टर अवर्षणप्रवण क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय परिमाण २.५६ आहे.

२.	या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५/४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च-८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०२) (०४) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजना अंतर्गत) (४७०१ एच ७६३) सारंगखेडा बॅरेज मध्यम प्रकल्प याखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३.	प्रकल्पाची सुधारित किंमत पुढील येणा-या अधिवेशनात विधानमंडळाच्या निदर्शनास लाक्षणिक पुरक मागणीद्वारे आणण्यांत येईल.

४.	हा निर्णय शासन पाटबंधारे विभाग निर्णय क्र.संकीर्ण १०९९/(१२६/९९) मोप्र (प्र) दिनांक १८.५.९९ च्या आदेशातील तरतुदीनुसार व आंतरवित्त सल्लागार व सह सचिव यांनी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २००९१०२११३३७११००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सहपत्र : वरीलप्रमाणे १ व २

**( सु.बा.सलाम)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत सहपत्रासह अग्रेषित :-

महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२) अर्थ-२, अर्थ-१०, व्यय-६ अ, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे (सोबत सुधारित अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, धुळे मध्यम प्रकल्प विभाग क्र.१, धुळे
स्वीय सहायक, मा.मंत्री (जलसंपदा) (कृ.खो.पा.वि.महामंडळ वगळून) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (द.व.प्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, उप सचिव (मोप्र-२) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (म.प्र.) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (म.प्र.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने : जसंअ, निवसं-१, अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मध्यम प्रकल्प, कार्यासन संग्रहार्थ

**तक्ता क्रमांक १**

सारंगखेडा बॅरेज मध्यम प्रकल्प ता. शहादा जि.नंदूरबार

शासन निर्णय क्र. सुप्रमा २००९/६५४/(२१३/०९)/मध्यम प्रकल्प दिनांक २०.१०.२००९ चे सहपत्र

तृतीय सुधारित अंदाजपत्रक उपशिर्षवार तरतुदी

| **अ.क्र.** | **उपशीर्ष** | **सुधारित प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष)** |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १) | 'अे'प्राथमिक सर्वेक्षण | ६७.७५ |
| २) | 'बी' भूसंपादन | ३१४.१५ |
| ३) | 'सी' कामे | २०६७४.९३ |
| ४) | 'के' इमारती | १२८.११ |
| ५) | 'एम' वृक्षारोपण | २९.७५ |
| ६) | 'आे' संकिर्ण | ३९८.८१ |
| ७) | 'पी' देखभाल व दुरुस्ती | २७६.१४ |
| ८) | 'क्यू' हत्यारे व संयत्रे | ७६.४७ |
| ९) | 'आर' दळणवळण | २७३.४९ |
| | एकूण कामाप्रित्यर्थ | २२२३९.६० |
| | आस्थापना व अनुषंगिक खर्च | ५४०९.४५ |
| | **एकूण प्रकल्पीय किंमत** | **२७६४९.०५** |

**तक्ता क्रमांक २**

सारंगखेडा बॅरेज मध्यम प्रकल्प ता. शहादा जि.नंदूरबार

शासन निर्णय क्र. सुप्रमा २००९/६५४/(२१३/०९)/मध्यम प्रकल्प दिनांक २०.१०.२००९ चे सहपत्र

**तृतीय सुधारित अंदाजपत्रक सर्वसाधारण संकलित गोषवारा**

| अ.क्र. | विवरण | रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| (अ) | **प्रत्यक्ष खर्च**<br>१) शीर्षकामे<br>२) कालवे | <br>२२२३९.६०<br>-- |
| | **एकूण (अ)** | २२२३९.६० |
| (ब) | १) आस्थापना खर्च (ब-जमिन वगळून) २० टक्के<br>२) हत्यारे व अवजारे ३.५ टक्के दराने (ब-जमीन क्यू हत्यारे वगळून<br>३) लिव्ह व पेन्शनरी चार्जेस ०.२५ टक्के (आस्थापना खर्चावर)<br>४) संग्रहावरील तूट ०.२५ टक्के | ४३८५.०९<br>७६७.३९<br>१०.९६<br>५४.४५ |
| | **एकूण (ब)** | **५२१७.९०** |
| | **एकूण (अ+ब)** | **२७४५७.५०** |
| (क) | **वजाती**<br>१) विशेष टी ॲंड पी वाहनावर (७५ टक्के) वैयक्तीक वहाने वगळून येणा-या रकमेवर<br>२) वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने<br>३) तात्पुरत्या इमारतीच्या किंमतीवर १५ टक्के दराने | <br>(-) ४९.८७<br><br>(-) ३.४०<br>(-) ३.८४ |
| | **एकूण वजाती (क)** | **(-) ५७.११** |
| | **एकूण प्रत्यक्ष खर्च (अ+ब)-क** | **२७४००.३९** |
| (ड) | **अप्रत्यक्ष खर्च**<br>१) वाहीतीलायक क्षेत्राच्या ५.०० टक्के दराने जमीन महसूल<br>२) लेखा व परीक्षण खर्च १.०० टक्केचे कामावरील खर्च, बी जमीन वगळून<br>३) सचिवालय चार्जेस<br>(आस्थापनेच्या खर्चावर ०.५० टक्के दराने) | <br>७.४८<br>२१९.२६०<br>२१.९३ |
| | **एकूण अप्रत्यक्ष खर्च (ड)** | **२४८.६६** |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत (अ+ब +क +ड)** | **२७६४९.०५** |